भाषा संचालनालय कार्यालयास कार्यालयीन वापरासाठी नवीन फोटो कॉपी यंत्र खरेदी करण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भासस-२०२४/प्र.क्र.६६/भाषा-१,**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-** १. भाषा संचालक, भाषा संचालनालय यांचे पत्र क्र.संकीर्ण २०२४/प्र.क्र.७६/८५९/चौदा, दि.२९.०७.२०२४
२. भाषा संचालक, भाषा संचालनालय यांचे पत्र क्र.आखदे २०२४/प्र.क्र.७६/९५२/चौदा, दि.०८.०८.२०२४

**प्रस्तावना -**

मराठी भाषा विभागाच्या अधिनस्त असलेल्या भाषा संचालनालय या कार्यालयातील जुने फोटो कॉपी यंत्र नादुरुस्त असल्याने नवीन CANON IR २९२५ फोटो कॉपी यंत्र खरेदी करण्याच्या अनुषंगाने प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य यांनी संदर्भाधीन पत्रांन्वये प्रस्ताव सादर केला होता. त्यास अनुसरुन नवीन फोटो कॉपी यंत्र खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या संदर्भाधीन दि.२९.०७.२०२४व दि.०८.०८.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने भाषा संचालनालय, वांद्रे या कार्यालयाकरिता कार्यालयीन वापरासाठी नवीन फोटो कॉपी यंत्र खरेदी करण्यास रुपये १,८८,८००/- ( अक्षरी रुपये एक लक्ष अठ्ठयाऐंशी हजार आठशे रुपये फक्त) इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता खालील अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे,

अ) याप्रकरणीची खरेदी प्रक्रिया उद्योग, उर्जा व कामगार विभाग यांच्याकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णय, ज्ञापन, परिपत्रकांनुसार राबविण्यात यावी.
ब) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.२६-अ, नियम क्र.७६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी
क) सदर यंत्र कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक तांत्रिक मनुष्यबळ व अन्य सुविधा उपलब्ध असल्याची खात्री करावी. तथापि, याकरिता नव्याने पदनिर्मिती करु नये.
ड) सदर यंत्रसामग्रीच्या अनुषंगाने व्दिरुक्ती होणार नाही याची खात्री करावी.
इ) प्रस्तुत प्रयोजनासाठी खरेदी करण्यात आलेली यंत्रसामग्री विनावापर पडून राहणार नाही व त्याचा विहीत मुदतीत वापर होईल, याबाबत सक्षम प्राधिकारी यांनी दक्षता घ्यावी.
सदर अटींची पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी भाषा संचालनालय कार्यालयाची असेल.

२. यांप्रकरणीचा खर्च मागणी क्र.झेडएफ-०१, २०५२- सचिवालयीन सर्वसाधारण सेवा, ०९० सचिवालय, (००) (००) (०२) भाषा संचालक (अनिवार्य) (२०५२ ५०६३) , १३-कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षातून भागविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.२६-अ, नियम क्र.७६ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात यत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१९११५२३७६०३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MARUTI LAXMAN LHAYAKAR

Digitally signed by MARUTI LAXMAN LHAYAKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT,
2.5.4.20=8b602cc35713bc737e58d3d44ef592bf297a5d88ada3a0b76b51280ec6081313, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=48E018A56D88390B5D52CAF1AC6184FB1588E15FEBCF18C68DECE92BF667529B, cn=MARUTI LAXMAN LHAYAKAR
Date: 2024.08.19 12:08:36 +05'30'

**( मा.ल.ल्हायकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल भवन, मुंबई
२ मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३ मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४ मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५ मा.मंत्री, मराठी भाषा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६ सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७ मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, विधान भवन, मुंबई,
८ मा.अध्यक्ष/सदस्य, मराठी भाषा समिती, विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
९ मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
१० महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
११ महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),नागपूर,
१२ प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
१३ प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
१४ प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
१५ अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय मुंबई,
१६ अपर मुख्य सचिव, मराठी भाषा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१७ सहसचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२० सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१ भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई
२६. निवड नस्ती (भाषा -१)